# साधूचा शाप

( एक मनोरंजक बालकथा )


—: लेखिका :—

श्री. तारा चौधरी



रम्यकथा प्रकाशन,

३९२ नारायण पेठ, कान्हेरे बिल्डिंग, पुणें ३०

किमत २५ पैसे

प्रकाशक :
वा. म. मेहेंदळे
रम्यकथा प्रकाशन,
३९२ नारायण पेठ, पुणें ३०.



प्रथमावृत्ति : १९६४
चतुर्थावृत्ति : जानेवारी १९७१

किंमत २५ पैसे

मुद्रक :
वा. म. मेहेंदळे
नवभारत मुद्रणालय,
५५१ बुधवार पेठ, पुणें २.

# साधूचा शाप

राजकन्या पुष्पमालाचें नांव निघालें कीं, सगळे लोक तिची स्तुति करीत असत. जो तो म्हणे, ती फार सुंदर आहे. ज्यानें पाहिलें तो तर तिची वाहवाच करी, पण ज्यानें कधीं पाहिलें नाहीं तोहि तिच्या सौंदर्याची अगदीं तोंडभरून स्तुति करी. ती खरोखरच फार सुंदर होती. ती अंगानें सडपातळ होती. ती फार उंच नव्हती कीं फार ठेंगणीहि नव्हती. तिचा वर्ण गोरापान होता. तिचा चेहरा चंद्रासारखा सुंदर दिसत असे. तिचे गाल जणूं गुलाबाचीं दोन फुलेंच शोभत असत आणि तिचे दोन्ही डोळे जणूं त्या गुलाबाच्या फुलांवर दोन भुंगे येऊन बसले आहेत असें वाटे. तिचें नाक चाफेकळी-प्रमाणें सुंदर दिसे. अशा तऱ्हेची ती सुंदर राजकन्या आतां तरुण झाली होती व ती अधिकच सुंदर दिसत होती.

राजा पुष्पसेनची ती एकुलती एक कन्या होती. राजाची ती फार लाडकी होती. त्यानें तिच्या शिक्षणाची फार उत्तम व्यवस्था केली होती. तिला लिहिणें-वाचणें तर त्यानें शिकविलें होतेंच, पण राज्यकारभाराचेंहि शिक्षण तिला दिलें गेलें होतें. लढाईचें शिक्षणहि तिनें घेतलें होतें. घोड्यावर बसणें, तलवार चाल-

वणें वगैरे युद्धकलेंत ती निपुण झाली होती.

ती जशी तरुण झाली तसा तिला एक छंद लागला. तो म्हणजे शिकारीचा. ती आपली उठल्या-बसल्या घोड्यावर स्वार होई व स्वतः शिकार करण्या-साठीं राखून ठेवलेल्या रानांत जाऊन शिकार करी. कधीं वाघाची तर कधीं अस्वलाची, कधीं हरिणाची तर कधीं सशाची. वाघ–अस्वलाशीं तिची क्वचितच गांठ पडे, पण हरिणाची शिकार तिला नेहमींच सांपडे. ती शिकारीला गेली व तिनें हरीण मारलें नाहीं असें क्वचितच घडत असे.

अशाप्रकारें ती एकदां अरण्यांत शिकारीला गेली. तिनें हरणांच्या कळपांतील एका काळविटावर आपला नेम धरला आणि बाण सोडला. बाण सूं ऽ ऽ करीत गेला व त्या काळविटाच्या पायांत शिरला आणि तो काळ-वीट तेथेंच जमिनीवर कोसळला.

ह्या प्रकार पाहून बाकीचीं हरणें तेथून उधळलीं व एका क्षणांत दिसेनाशी झालीं. पण तो काळवीट जखमी झाला होता, तो धांवूं शकत नव्हता.

शिकार मिळाली असें वाटून राजकन्या पुष्प-लता तिकडे गेली. ती त्या काळविटाकडे पाहूं लागली आणि तिला अतिशय नवल वाटलें. तेथें जमिनीवर तो काळवीट नव्हता तर तेथें एक अत्यंत सुंदर व तेजःपुंज तरुण पडला होता. ज्याच्या पायाला बाण लागला होता. तो तरुण कण्हत होता आणि हातानें तो बाण काढ-

ण्याचा प्रयत्न करीत होता. पण तो बाण पायांत बराच खोल शिरला होता. तो त्याला काढतां येईना.

राजकन्या आतांपर्यंत घोड्यावरूनच त्याच्याकडे पहात होती. आतां त्याचीहि नजर राजकन्येकडे गेली. दोघांनीं एकमेकांकडे पाहिलें. पण कोणी कोणाशीं बोललें नाहीं. तो तरुण सारखा विव्हळत होता व बाण उपसून काढण्याचा प्रयत्न करीत होता, पण बाण कांहीं निघेना.



राजकन्या घोड्यावरून खालीं उतरली. ती त्या तरुणाजवळ गेली. तिनें त्याचा पाय एका हातांत धरला व दुसऱ्या हातांत बाण धरला आणि तो खस्‌कन उपसून काढला. बाण निघाला आणि त्याचवेळीं त्या तरुणाच्या पायांतून रक्ताची धार भळभळां वाहूं लागली. तो बेशुद्ध पडला.

राजकन्येला त्या तरुणाची दया आली. हा आपला मोठाच अपराध झाला असें तिला वाटूं लागलें. तिनें लगेच आपल्या साडीचा बराच मोठा तुकडा फाडला व त्या तुकड्यानें तिनें ती जखम बांधली. रक्त वाहणें बंद झालें. तिनें आपल्या जवळच्या बाटलींतील पाण्यानें त्याच्या तोंडावर दोन–चार हबके मारले. त्यानंतर तो तरुण शुद्धीवर आला आणि शांतपणें पडून राहिला. तो कष्टत होता, त्याला दुःख फार झालें होतें. पण तो समाधानी दिसत होता.

बराच वेळ दोघेंहि कांहीं बोलले नाहींत. नंतर राजकन्या म्हणाली, ‘ माझा बाण लागला आपणांला, मला क्षमा करा. मीं हरिणाला मारला होता तो. चुकून आपणांला लागला. ’

तो तरुण म्हणाला, ‘ क्षमा कसली ? आपले उपकार झालेत माझ्यावर. आपण तो बाण हरिणाला मारला होता हें खरें, व तो मला लागला हेंहि खरें. पण तें जाऊं द्या. तुम्हीं मात्र माझ्यावर अनंत उपकार केले. मी तुमचा आभारी आहें. आपण राजकन्या आहांत. मी आपले उपकार जन्मभर विसरणार नाहीं. ’

राजकन्या म्हणाली, ‘ हे तरुणा, मीं तुझा गुन्हा केला तरी तूं माझे आभार मानतोस ! खरोखर तूं फार थोर मनाचा आहेस आणि मी एक राजकन्या आहें हें तूं कसें ओळखलेंस ? तूं आहेस तरी कोण ? येथें का आलास ? हें माझें राखीव रान आहे. येथें फक्त मीच

शिकारीला येतें. तूं येथें आलास कसा ?'

तो तरुण म्हणाला, ' हे राजकुमारी, ती एक फार मोठी कहाणी आहे. पण जाऊं दे तें. मी लवकरच तुमच्या ह्या अरण्यांतून निघून जाईन.'

राजकन्या म्हणाली, ' बरें, आतां तूं आमच्या राजधानीला चलतोस काय ? मी तुला माझ्या घोड्या-वर बसवून नेतें. तूं बरा झाल्यावर जा हवें तिकडे.'

तरुण म्हणाला, ' हे राजकुमारी, तुमचे माझ्या-वर अनंत उपकार झाले आहेत. याच उपकारांच्या ओझ्यानें मी दबून गेलों आहें. आतां आणखीं उपकार नकोत. मी आतां लवकरच माझ्या गांवाकडे निघणार आहें.'

अखेरीस तो तरुण कांहीं तिच्याबरोबर यायला तयार झाला नाहीं. तिनें त्याला तेथेंच रानांत सोडून दिलें व आपला घोडा राजधानीकडे वळवला. पण आतां ती विचारांत मग्न झाली होती. ती मनाशीं विचार करीत होती, कीं मीं तर हरिणाला बाण मारला. हरिणाला बाण मारतांना मी प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें आणि मग तो त्या माणसाला कसा लागला ? तो माणूस तेथें कोठून आला ? तो आहे तरी कोण ? त्यानें खरें म्हणजे माझ्यावर रागवायचें, संतापायचें पण त्यानें उलट माझे आभार मानले. हा काय प्रकार आहे ? यांत कांहीं रहस्य तर नाहीं ना ? ह्याच विचा-रांत ती घरीं पोंचली.

दुसऱ्या दिवशीं राजकन्या घोड्यावर स्वार झाली व आपल्या राखीव अरण्यांत शिकारीला गेली, पण आज तिचें शिकारीकडे लक्ष नव्हतें. ती काल ज्या ठिकाणीं तो तरुण जखमी होऊन पडला होता, त्या ठिकाणीं गेली आणि तिनें त्या तरुणाचा शोध घ्यायला सुरुवात केली. तिनें त्याला तेथें जवळपास खूप खूप शोधलें पण तो कांहीं तेथें भेटला नाहीं. अखेरीस तो कुठें तरी गुप्तपणें लपून बसला असेल म्हणून तिनें त्याला खूप खूप हांका मारल्या, 'हे प्रवासी तरुणा' म्हणून तिनें तेथें फार मोठ्यानें आरोळ्या ठोकल्या. तिच्या आवाजाचे प्रतिध्वनि सर्व दिशांना उठले, पण तिला कांहीं तो तरुण तेथें आढळला नाहीं आणि त्या दिवशीं ती तेथून तशीच परतली. तिनें आज कशाचीच शिकार केली नाहीं.

आतां ती दररोज त्या अरण्यांत येई. सर्व अरण्यभर फिरे. ती सारखा त्या तरुणाचा शोध करी, पण तो कांहीं तिला आढळत नसे. ती तेव्हांपासून दररोज जरी शिकारीला येत असली तरी तिनें त्यानंतर मुळींच शिकार केली नाहीं.

तो तरुण राजकन्येला म्हणाला होता कीं, मी हें अरण्य सोडून जाणार आहें. माझ्या गावाकडे जाणार आहें. पण तो कांहीं गेला नव्हता. तो तेथेंच होता. पण तो आतां फार सावधपणें वावरत होता. कांहीं केल्या तो राजकन्येच्या दृष्टीस पडेना. त्यानें आपल्या लप-

ण्याच्या चांगल्या जागा शोधून काढल्या होत्या. अशा त्या गुप्त जागीं तो लपून राही आणि मधून मधून त्या राजकन्येची टेहळणी करी. ती सुरुवातीला हांक मारीत असे, पण तो कांहीं तिला सामोरा गेला नाहीं. आतां त्याच्या पायाची जखम पूर्ण बरी झाली होती आणि त्यानें आपल्या खाण्यापिण्याचीहि चांगली सोय केली होती. त्यानें त्या रानांत चांगल्या फळांचीं झाडें शोधलीं होतीं. खाण्यास उपयुक्त अशीं कंदमुळें शोधलीं होतीं. त्या फळांवर व कंदमुळांवर तो चांगला ताव मारीत असे. तो तरुण त्या अरण्यांत बहुधा रात्रीं किंवा अगदीं सकाळीं फिरत असे. कारण त्यावेळीं राजकन्या त्या वनांत येणें शक्य नव्हतें आणि त्यामुळें तो राजकन्येच्या नजरेपासून आपल्याला लपवून ठेवूं शकत होता.

असे दिवसांमागून दिवस चालले आणि राजकन्येचें व त्या तरुणाचेंहि नेहमींचें कार्य तसेंच पुढें चाललें.

पण एके दिवशीं एक भयंकर प्रसंग राजकन्येवर आला. ती दुपारच्या वेळीं त्या राखीव अरण्यांत आली आणि त्या तरुणाला ज्या ठिकाणीं बाण लागला होता त्या जागेवर येऊन थांबली. तेथें ती घोड्यावरून उतरली आणि जवळच्या एका झाडाखालीं उभी राहून कांहीं विचार करूं लागली, तोंच भोंवतालच्या जाळींत

लपलेले चार चांगले दांडगट पुरुष धांवत आले व त्यांनीं तिला पक्कें धरलें. ते चौघेहि खूपच शक्तिवान होते. तसेंच त्यांच्याजवळ तलवारी होत्या. ते कोण हेंहि राजकन्येला ओळखतां येईना, कारण त्यांनीं डोळ्यांवर काळ्या पट्ट्या बांधल्या होत्या.

तिच्यावर ह्या अचानक झालेल्या हल्ल्यानें ती फारच घाबरली. तिनें त्यांच्या तावडींतून निसटण्याची खूप खटपट केली पण तींत तिला यश आलें नाहीं. एक स्त्री चार पुरुषांशीं कसा सामना करणार? आतां हे आपणांला कुठेंतरी नेणार हा विचार तिच्या डोक्यांत आला व ती आपल्या बचावासाठीं मोठ्यानें ओरडली, 'वांचवा वांचवा! धांवा! मला वांचवा!' तिच्या ह्या आवाजानें तें अरण्य दणाणून गेलें. पण तेथें तिच्या बचावासाठीं कोण येणार?

त्या चौघांनीं तिला दोरखंडानें चांगलें बांधलें. तिच्या तोंडांत बोळा कोंबून तिचें तोंड बंद केलें. तिला तिच्याच घोड्यावर बसविलें व ते तिला घेऊन निघाले.

पण संकटाच्या वेळीं परमेश्वर कुणाच्या तरी रूपानें मदतीसाठीं धांवून येतो म्हणतात ना? तसेंच झालें! राजकन्येचा घोडा मध्यें होता व त्याच्या चारी बाजूंनीं ते चौघे चालत होते. ते एका झाडाखालून चालले होते आणि एखादा मोठा धोंडा कोसळावा असा कांहींसा प्रकार झाला. त्या झाडावरून कुणींतरी उडी मारली व त्यानें घोड्याच्या मागून चालणाऱ्या माण-

साला जमिनीवर लोळविलें. तो धाडकन् जमिनीवर कोंसळला.

झाडावरून उडी मारणारानें प्रथम त्या माण-साची तरवार हिसकावून घेतली आणि त्यानें त्या चौघांशीं एकदम लढायला सुरुवात केली. बाकीच्या तिघांनींहि आपापल्या तरवारी सरसावल्या. त्यांची तेथें चांगलीच लढाई जुंपली. ह्या अचानक आलेल्या संकटा-मुळें ते अगोदरच गोंधळले होते. त्यांचें धैर्य खचलें व त्यांनीं तेथून पळ काढला.

त्या आगंतुक माणसानें राजकन्येचीं बंधनें सोडून तिला मोकळें केलें. ती घोड्यावरून खालीं उतरली आणि त्या माणसाकडे पाहूं लागली.

तो तोच तरुण होता. ती म्हणाली, 'आपण थोर मनाचे आहांत तसे फार शूरहि आहांत. आपण एकदां माझा मोठा अपराध असतांना मला क्षमा केली आणि आज माझे प्राण वांचविले. पण आपण कोण आहां तें का सांगत नाहीं ? आपण आतां राजधानीला चला अशी माझी विनंति आहे. मी सगळी घटना माझ्या पिताजींना सांगेन म्हणतें. ते तुमच्या पराक्रमाची फार वाहवा करतील तुम्हांला मोठें बक्षीस देतील. तुमचा गौरव करतील.'

पण तो तरुण राजकन्येच्या ह्या बोलण्यावर फक्त हंसला.

ती पुढें बोलूं लागली, 'हे कोण होते कांहीं कळत

नाहीं. त्यांनीं मला कां पकडलें असावें ? ते कुठें नेणार होते मला ? कांहीं बोध होत नाहीं. पण हें कांहीं तरी कारस्थान असलें पाहिजे असें वाटतें आणि यांत माझ्या जिवाला धोकाहि आहे. आतां तुम्ही चला माझ्याबरोबर !'

त्यावेळीं तो तरुण पुन्हां हंसला व म्हणाला, ' मीं माझें कर्तव्य केलें आहे. कर्तव्याबद्दल कोणी बक्षीस घेत नसतो. '

इतकें बोलून तो त्या अरण्यांत दाट झाडीच्या रोखानें पळत निघून गेला. तो क्षणभरांत दिसेनासा झाला.

राजकन्या फार खिन्न झाली. ती घोड्यावर बसली व घराकडे निघाली, पण ती सरळ रस्त्यानें आली नाहीं. तिनें आडमार्ग धरला व ती घरीं येऊन पोंचली.

रात्रीं ती निजली तरी तिला झोंप कांहीं येईना. ती त्या घटनांवर विचार करीत होती. अखेरीस तिनें ही सगळी हकीकत आपल्या बापाला सांगितली.

ती हकीकत ऐकून राजाला तर धक्काच बसला. आपल्या कन्येवर अशा तऱ्हेचा हल्ला करणारा व तिला बांधून नेणारा दुष्ट कोण असावा बरें ? याचा विचार करूनहि त्याला कांहीं बोध होईना.

दुसऱ्या दिवशीं त्यानें आपल्या प्रधानाला बोलाविलें व त्याला ह्या घटना सांगितल्या आणि ' ते चौघे

बदमाष कोण आहेत त्यांना शोधून काढा व राजकन्येच्या राखीव शिकारी वनांत जो एक तरुण लपून बसला आहे त्याचाहि शोध करा ' असा हुकूम केला.

राजाची ही आज्ञा घेऊन प्रधान घरीं गेला. तो आरशासमोर उभा राहिला. त्यानें मिशीवर ताव दिला आणि तो किंचित् हंसला.

लगेच त्यानें आपल्या तैनातींतील एका शूर सरदाराला बोलाविलें आणि त्याला आज्ञा सोडली– ' सरदार, उद्यां दहा शिपाई घेऊन राजकन्येच्या राखीव वनांत जा व सगळें रान धुंडाळून काढा. त्या वनांत एक तरुण पुरुष लपून बसलेला आहे. त्याचा शोध करा व तो सांपडला कीं त्याला तेथल्या तेथें ठार मारा. जिवंत ठेवूं नका. त्याचें प्रेतहि तिकडच्या तिकडे नष्ट करून टाका आणि राजकन्या दिसली तर तिलाहि पकडा आणि नगराबाहेरच्या वाड्यांत कोंडून टाका. तिला आणतांना तिचें तोंड बंद करून आणा आणि तिला चांगलें कपड्यांत गुंडाळून आणा. कोणाला पत्ता लागतां कामा नये. '

दुसऱ्या दिवशीं प्रधानाचे दहा शिपाई राजकन्येच्या राखीव शिकारी वनांत शिरले व त्यांनीं दिवसभर तें अरण्य धुंडाळून काढलें पण त्यांना तेथें कोणीहि तरुण आढळला नाहीं आणि त्या दिवशीं राजकन्याहि तिकडे फिरकली नाहीं.

तिसऱ्या दिवशीं मात्र राजकन्येकडून राहवलें

नाहीं. तिनें अगदीं सकाळीं घोडा घेतला व ती कोणास नकळत त्या वनांत शिकारीसाठीं निघून गेली. जातांना तिनें फक्त वडिलांना सांगितलें.

ती म्हणाली, ' पिताजी, मी शिकारीसाठीं रानांत जात आहें. काय वाटेल तें करून मला त्या तरुणाचा शोध केलाच पाहिजे. तो फार शूर आहे आणि स्वार्थ तर त्याला शिवतहि नाहीं. '

राजानें तिला खूप खूप रोंखलें, पण ती कांहीं थांबली नाहीं. ती अरण्यांत गेली आणि इकडे राजा काळजींत पडला. पुन्हां परवांसारखें संकट तिच्यावर कोंसळलें तर ? लगेच राजानें प्रधानाला बोलाविलें व राजकन्या रानांत गेली असल्याचें सांगितलें.

प्रधान म्हणाला, ' महाराज, आपण कांहीं चिंता करूं नका. मी ताबडतोब कांहीं शिपाई त्या अरण्यांत रवाना करतों. ते राजकन्येचें रक्षण करतील. '

राजकन्या अरण्यांत वणवण भटकत होती. तिचे डोळे त्या तरुणाच्या शोधासाठीं भिरभिर फिरत होते, पण तिला तो कांहीं दिसेना. अशाप्रकारें भटकतां भटकतां तिसरा प्रहर उलटून गेला. ती विश्रांति घेण्यासाठीं एका झाडाखालीं थांबली. तिनें घोडा जवळच चरायला सोडला आणि ती जरा झाडाखालीं बसली तोंच...

तोंच तिच्या रोंखानें कोणीतरी येत आहे असें दिला दिसलें. तो परवांच्या त्या चौघांचा पोषाख होता त्याप्रमाणेंच पोषाख केलेला एक माणूस होता. त्याच्या

डोळ्यांवर पट्टीहि लावली होती.

त्याला पाहून राजकन्या घाबरली. लगेच ती उठली. तिनें आपल्या कमरेची तरवार उपसली. ती सावध झाली. तिनें बाजूला पाहिलें, मागें पाहिलें, इकडे पाहिलें, तिकडे पाहिलें आणि सर्व बाजूंनीं तिच्याकडे डोळ्यांना पट्ट्या बांधलेले लोक येत आहेत असें तिला दिसलें.

आतां ती फार घाबरली आणि तिनें एक मोठी आरोळी ठोकली, 'धांवा ! वांचवा ! धांवा ! वांचवा !' तोंपर्यंत ते लोक बरेच जवळ आले होते व त्यांनीं तिला घेरलें होतें.



इतक्यांत एकजण म्हणाला, 'राजकुमारी, हातची तलवार खालीं टाक. आमच्या दहाजणांशीं तूं एकटी

सामना करूं शकणार नाहींस. तूं स्त्री आहेस. भलतेंच धाडस करशील तर प्राण गमावून बसशील. परवां निसटलीस, पण आज तूं सुटणार नाहींस. परवांचा तो प्रवासी आज धांवून येणें शक्य नाहीं. आलाच तर त्यालाहि आम्ही ठार करूं.'

यावर राजकुमारी कांहीं बोलली नाहीं. ती सावध मात्र होती व कांहीं झालें तरी या बदमाषांशीं सामना करायचाच असा तिनें निश्चय केला होता.

त्या लोकांनीं आपलें वर्तुळ आंवळत आणलें. ते तिला मारण्याऐवजीं पकडण्याच्या विचारांत होते; पण राजकन्येनें आपली तरवार चालवायला आरंभ केला. तिनें पहिल्याच क्षणांत एका माणसाला स्वर्गाला रवाना केलें व दोघांना चांगलें जखमी केलें.

आतां मात्र त्या लोकांनीं विचार बदलला. ही अशी सरळ पकडली जाणें शक्य नाहीं हें त्यांनीं ओळखलें आणि त्यांनीं तिला जखमी करण्याचा प्रयत्न चालविला. एकानें तिच्या हातावर तलवारीचा वार केला. ती जखमी झाली तरी लढतच होती; पण तिची शक्ति आतां कमी होऊं लागली होती. दहा पुरुषांशीं ती एकटी स्त्री किती वेळ लढूं शकणार? त्याचवेळीं तिनें पुन्हां एकदा पुकारा केला, 'धांवा! धांवा! वांचवा! वांचवा!...'

आणि त्याचक्षणी त्या झाडावरून जणूं राक्षस खालीं कोसळला. तो परवांचाच तरुण होता. त्यानें

तोंडांत तरवारीचें पातें धरलें होतें. त्यानें झटकन् ती तलवार हातीं घेतली व शेळ्या-मेंढ्यावर लांडगा जसा तुटून पडतो तसा तो त्या लोकांवर तुटून पडला. पहिल्याच दमांत त्यानें दोघांना ठार मारलें व दोघांना जखमी केलें.

हा परवांचाच आपला काळ आला आहे, हें त्यांतील दोघां-तिघांनीं ओळखलें व त्यांनीं तेथून पोबारा केला. फक्त तिघेच तेथून पळून जाऊं शकले. तिघे ठार झाले होते व चौघे जखमी होऊन कण्हत पडले होते.

ते तिघेजण पळून गेल्यावर तो तरुण व राजकन्या त्या जखमी माणसांकडे वळली. प्रथम त्यांनीं त्यांच्या तोंडावरील बुरखे काढले आणि राजकन्येला धक्काच बसला. ते तर राजवाड्यांतील लोक होते व प्रधानाच्या तैनातींतील शिपाई होते. नंतर राजकन्याच पुढें झाली व तिनें त्या मेलेल्या शिपायांच्या तोंडावरील पट्ट्या काढल्या. तेहि प्रधानाच्या तैनातींतीलच लोक होते.

हें पाहून राजकन्या तर फार विचारांत पडली. हा प्रकार तरी काय आहे, हें तिला कळेना. नंतर त्या दोघांनीं त्या चौघां जखमी माणसांना ओढत आणून झाडाच्या बुंध्याशीं आदळलें. नंतर त्या तरुणानें त्या लोकांपैकीं एकाचा अंगरखा फाडून एक लांब पट्टी काढली व त्या पट्टीनें राजकन्येच्या दंडावरील जखम

बांधली.

आतां थोडें शांत झालें होतें. ते जखमी लोक मात्र कण्हत होते. राजकन्येनें आपली तरवार घेतली. ती त्या जखमी माणसांजवळ गेली व त्यांना दरडावून म्हणाली, ' बदमाषांनो, सांगा हा काय प्रकार आहे तो ? तुम्हीं माझ्यावर हल्ला कां केला ? तुम्हांला कोणीं करायला सांगितलें हें अघोरी काम ? सांगा, सगळें खरें खरें सांगा. नाहींतर आत्तांच्या आत्तां तुमच्या माना उडवितें ह्या तरवारीनें. '

राजकन्येची ही दरडावणीची भाषा ऐकतांच एक-जण घाबरला व म्हणाला, ' राजकुमारी, क्षमा करा आम्हांला. आम्ही हुकमाचे गुलाम. मालकाचा हुकूम होता तसा आम्हांला. '



' कोण मालक ?' राजकन्या कडाडली.

'आपले प्रधानजी.' तो माणूस म्हणाला.

'कोण, प्रधानजी? त्यांचें कारस्थान आहे काय हें? सगळें नीट सांगा.' राजकन्या म्हणाली.

तो सांगूं लागला, 'होय, प्रधानांचेंच हें कारस्थान आहे आतां महाराज वयोवृद्ध झाले आहेत. आपण महाराजांच्या एकुलत्या एक कन्या आहांत. तर आपणांला पकडून कुठेंतरी गुप्तरीतीनें ठेवून द्यावें आणि मग चार-सहा महिन्यांनीं आपणांला सोडवून आणण्याचें प्रधानांनीं नाटक करावें अशी त्यांची ही योजना होती. प्रधानजी आपल्याला सोडवून आणल्याचें बक्षीस म्हणून राजाजवळ प्रत्यक्ष आपलीच मागणी करणार होते. मग महाराजांकडून नाहीं म्हणवलें गेलें नसतें. महाराजांनीं आपलें लग्न प्रधानाबरोबर लावून दिलें असतें. अशा तऱ्हेनें प्रधानाचें हें राजा होण्याचें स्वप्न आहे.'

'असें काय?' राजकन्येच्या तोंडून उद्गार बाहेर पडले.

नंतर तो म्हणाला, 'राजकुमारी, हीं तिघे आतां जीं पळून गेलीं आहेत, तीं प्रधानासमोर जाणार नाहींत. कारण प्रधानानें आम्हांला अशी सक्त ताकीद दिली आहे कीं, एक तुम्हांला तरी पकडून आणा. किंवा ह्या तरुणाचें मुंडकें तरी कापून आणा. जर हें जमलें नाहीं तर तुम्हां सर्वांना ठार मारून टाकीन. दोहोंतून एकहि काम झालें नाहीं; म्हणून प्रधान त्यांना जिवंत ठेवणें

शक्य नाहीं.'

आतां मात्र राजकन्या विचारांत पडली. प्रधानाच्या ह्या नीच कामाबद्दल तिला फार राग आला आणि त्याचा कसा निकाल लावावा ह्याचा ती विचार करूं लागली.

तितक्यांत तो तरुण म्हणाला, 'राजकुमारी, मला आतां परवानगी द्या जाण्याची.'

पण आतां ती त्या तरुणाला जाऊं द्यायला तयार नव्हती. तिनें त्याचा हात धरला व त्याला त्या झाडाच्या खालीं बसवलें. ती म्हणाली, 'आपण हें काय करतां असें ? आपण एकदां माझा महान अपराध माफ केला. दोन वेळां माझे प्राण वांचविले आणि पुन्हां जातों म्हणतां. तें कांहीं नाहीं. आतां तुम्ही आणि मी दूर होऊं शकत नाहीं. तुम्ही माझे देव आहांत. मी तुम्हांला मनानें पति म्हणून वरलें आहे. आतां मला टाकून जाऊं नका. नाहींतर मी यापुढें जिवंत राहणें शक्य नाहीं. मी तुम्हांला कित्ती कित्ती शोधत होतें आणि त्यामुळेंच ह्या प्राणसंकटांत सांपडलें. आतां सरळ माझ्याबरोबर राजधानींत चला आणि मग काय तें बोला.'

आतां मात्र त्या तरुणानें राजकन्येचें म्हणणें ऐकलें व तो तिच्याबरोबर यायला तयार झाला. लगेच त्यांनीं त्या जखमी लोकांना घोड्यावर बांधलें. ते दोघेहि घोड्यावर स्वार झाले व तेथून परतले. त्यांनीं

ते मुडदे व मेलेल्या शिपायांचे घोडे तेथेंच सोडून दिले. पण ते बरीच रात्र पडल्यावर शहराजवळ गेले. तेहि सरळ राजवाड्यांत गेले नाहींत. त्यांनीं आपला मोर्चा शहराबाहेर प्रधानाचा जो महाल होता तिकडे वळविला.

ती मंडळी त्या महालाजवळ गेली तेव्हां तो तरुण व राजकन्या यांनीं तरवारी उपसल्या व तेथील त्या सर्व पहारेकऱ्यांना आणि नोकर–चाकर मंडळींना त्या महालाच्या एका कोठींत नेऊन कोंडून टाकलें. नंतर त्यांनीं त्या जखमी मंडळींना एका खोलींत नेऊन त्यांची नीट व्यवस्था लावली.

तोंपर्यंत मध्यरात्र होत आली होती. आतां राजकन्येनें शिपायाचा पोषाख केला. डोळ्यांवर पट्टी बांधली व ती घोड्यावर स्वार होऊन सरळ प्रधानाच्या वाड्यांत गेली.

प्रधान वाटच पहात होता. राजकन्या प्रधानाच्या समोर गेली. तिनं लवून मुजरा केला व ती म्हणाली, 'महाराज, काम फत्ते झालें. ताबडतोब चलावें.'

कोणताहि विचार न करतां प्रधान तिच्या मागें निघाला.

राजकन्या व प्रधान बाहेरील महालांत पोहोंचले. दारावरच तो तरुणहि डोळ्याला काळी पट्टी लावून उभा होता. प्रधानानें त्या महालांत प्रवेश केला व राज-

कन्येचें समाधान झालें. ते तिघेहि एका मोठ्या दिवाणखान्यांत गेले, पण प्रधानाला तेथें राजकन्या दिसली नाहीं.

प्रधानाला एकदम राग आला आणि तो मागें वळून म्हणाला, 'कुठें आहे राजकन्या? हरामखोर कुठला.'

आणि त्याचवेळीं राजकन्येनें डोक्यावरील फेटा व डोळ्यांवरील पट्टी काढली व ती म्हणाली, 'मी आहें राजकन्या. बघ, हे नमकहराम प्रधाना, ही पहा तुझ्यासमोर राजकन्या उभी आहें.'

प्रधानाचा राग अनावर झाला व तो तेथील नोकरांना मोठमोठ्यानें हांका मारूं लागला. पण कोणी आलें नाहीं. इतक्यांत तो तरुण पुढें झाला. त्यानें त्या प्रधानाचें नाक धरलें, तरवारीनें चटकन् कापलें व



राजकन्येच्या हातीं दिलें.

राजकन्या म्हणाली, ' हे दुष्ट प्रधाना, ज्याचें अन्न खाल्लें त्या राजाचें नाक कापायला निघाला होतास काय ? आतां बघ त्याच्या मुलीनेंच तुझें नाक कापलें आहे. ' नंतर तिनें तो नाकाचा तुकडा तुच्छतेनें फेकून दिला व त्या दोघांनी त्या प्रधानाला एका खोलींत कोंडून टाकलें.

राजकन्येनें त्याच वेळीं महाराजांना बोलावून आणलें व सगळी हकीकत त्यांना सांगितली. राजाला हें ऐकून फारच आश्चर्य वाटलें व आनंदहि झाला. नंतर राजा त्या तरुणाकडे वळून म्हणाला, ' हे तरुणा, तूं कोण आहेस ? तुझा पूर्ववृत्तांत कळला तर आम्हांला फार आनंद होईल. '

तो तरुण बोलूं लागला, ' महाराज, मी एक राज-पुत्रच आहें. पण माझ्या हातून एका साधूचा फार मोठा अपराध घडला. मी रानांत शिकार करीत असतांना मीं एका हरिणाची शिकार केली. तें हरीण त्या साधूनें पाळ-लेलें होतें. आपलें हरीण या माणसानें मारलें हें पाहून त्या साधूनें मला शाप दिला कीं, तूं आज रात्रीं हरीण होशील. मला फार वाईट वाटलें. मीं त्या साधूचे पाय धरले व त्याची खूप गयावया केली. तेव्हां त्याचा राग कांहींसा कमी झाला व मग त्यानें मला उःशाप दिला कीं, एक राजकन्या तुझी शिकार करील. त्यावेळीं जर तूं जगलास तर तूं पुन्हां पूर्ववत् माणूस होशील. मेलास

तर गेलास.

'मी तेथून निघालों आणि घरीं जाण्याच्या ऐवजीं उलट दिशेनें चालूं लागलों. रात्र झाली. मला झोंप येईना. आतां मी हरीण होणार ह्याच चिंतेंत होतों. एकदांची झोंप लागली. सकाळीं उठतों तर मी हरीण झालों होतों. पुढें मी एका हरिणांच्या कळपांत मिसळलों व राहूं लागलों आणि मग आपल्या राजकन्येच्या बाणानें माझा उद्धार झाला. मी हरिणाचा पुन्हां माणूस झालों. म्हणून मी म्हणतों कीं आपल्या राजकुमारीचे माझ्यावर फार उपकार आहेत. त्यांचा बाण माझ्या पायावर लागला म्हणून मी बचावलों व माणूस झालों. पण तो बाण जर माझ्या छातींत घुसला असता तर मी ठार झालों असतों. हें जग सोडून गेलों असतों...'

ही हकीकत ऐकून राजाला व राजकन्येला नवल वाटलें व हा तरुण एक राजपुत्र आहे हें कळल्यामुळें त्यांना फार आनंद झाला.

लवकरच राजकुमारीचें त्या तरुण राजपुत्राबरोबर मोठ्या थाटात लग्न झालें.

तो दुष्ट प्रधान मात्र मरेपर्यंत कैदेंत पिचत पडला.

—: समाप्त :—